**मुंबई मेट्रो लाईन-३, कुलाबा वांद्रे-सिप्झ प्रकल्पाकरिता पुराभिलेख संचालनालयाची वांद्रे येथील ६६९१ चौ.मी.जागा मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.यांना तात्पुरत्या स्वरुपात ३ वर्षाकरिता हस्तांतरित करण्याबाबत करण्यात आलेल्या सामंजस्य करारास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मपुवि २०२०/प्र.क्र.८६/सां.का.२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ डिसेंबर ,२०२१.

वाचा: १.शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
क्र. मपुवि- २०१५/प्र.क्र.७५/सां.का.२, दि. ९ जुन २०१६
२. मुख्य परियोजना प्रबंधक-४, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.यांचे पत्र
क्र.No/MMRC/ML3/UGC-05/DoA/2020/1095,
Date 25 September, 2020.
३. संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र
क्रमांक : जा.क्र.पुरासंचा/मेट्रोलाईन-३/करार/२०२०/बी-१४८९
दि. २२ ऑक्टोंबर, २०२०.

**प्रस्तावना :**

पुराभिलेख संचालनालयाला मंजुर करण्यात आलेल्या मौजे वांद्रे, तालुका अंधेरी सर्व्हे नं-३४१, न.भू.क्र.६२९ मधील ७,५०० चौ.मी. जमिनीपैकी ६,६९१ चौ.मी. जमिनीचा आगाऊ ताबा तात्पुरत्या स्वरुपात ३ वर्षाकरिता मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशनला हस्तांतरित करण्यासाठी महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विशिष्ट अटी व शर्तींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात आलेली आहे . यामधील अट क्र.३ नुसार पुराभिलेख संचालनालय व मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन यांनी दि. १० एप्रिल, २०१७ रोजी सामंजस्य करार (MOU) केला आहे. सदर कराराची मुदत दि. १० एप्रिल, २०२० रोजी समाप्त झालेली असल्याने करारनाम्यास माहे सप्टेंबर, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात यावी, अशी विनंती मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. व पुराभिलेख संचालनालय यांनी अनुक्रमे संदर्भ क्र. २ व ३ येथील पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदर सामंजस्य करारास दि. ३० सप्टेंबर, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबई मेट्रो लाईन-३, कुलाबा वांद्रे-सिप्झ प्रकल्पाकरिता पुराभिलेख संचालनालयाची वांद्रे येथील ६६९१ चौ.मी.जागा मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.यांना तात्पुरत्या स्वरुपात ३ वर्षाकरिता

हस्तांतरित करण्याबाबत करण्यात आलेल्या सामंजस्य करारास दि. ३० सप्टेंबर, २०२२ पर्यंत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती कायम ठेवून याद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२२१२२८४४०८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2021.12.22 12:29:31 +05'30'

**( सु.दि.पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधनान सचिव.
३. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा-कुर्ला संकुल, वांद्रे, मुंबई-५१.
९. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., एमएमआरडीए बिल्डिंग, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१०.जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, प्रशासकीय इमारत, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
११.संचालक ,पुराभिलेख संचालनालय, एल्फिन्स्टन महाविद्यालय इमारत, काळाघोडा, एम.जी.रोड, फोर्ट, मुंबई-३.
१२.निवड नस्ती सां.का२.